ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति कथा पुढें सांगत । ऐसे नाना अवतार घेत । महात्मा विकट ते असंख्यात । वर्णनातीत महादेवींनो ।।१।। भक्तिप्रिय स्वभावें घेत । अवतार भक्तविघ्न निवारणार्थ । मयूरक्षेत्री सांप्रत । जावें तुम्ही सर्वांनी ।।२।। तेथ मीही पूर्ण रूपें वसत । येथ कलांशे संस्थित । क्षेत्री जाऊन विश्वेश्वरा सतत । शक्तींनो भजा भक्तीनें ।।३।। त्यानें योगींद्रवंद्य व्हाल । विषय भावांत चित्तावर मळ । साठतो म्हणून विमल । व्हावें तुम्ही शक्तींनो ।।४।। गणेशमार्गाचा आश्रय घेऊन । विकटासी भजा एकमन । वेदादींतही कर्म शोभन । कीर्तिलें जें गणेशपर ।।५।। तेच नित्य भक्तिभाव युत । आचरावें तुम्ही श्रद्धायुक्त । गणेशमूर्तीचें चिंतन हृदयांत । सदैव करा प्रिय शक्तींनो ।।६।। मानसी तैसी बाह्य पूजा । करून गणेशा तोषवा सहजा । विषयांत विरक्त होऊन भजा । विकटास तीच उत्तम भक्ति ।।७।। गणेशावरी होऊन आसक्त । करावी भक्ति ऐसी अविरत । मुद्गल सांगती दक्षाप्रत । आदिशक्ति ती देई ।।८।। एकाक्षर मंत्र शक्तींप्रत । विधियुक्त गणराजाचा उदात्त । नंतर ती मौन धरित । शक्ती करिती प्रणाम ।।९।। तदनंतर त्या भक्तियुक्त । महाकाळीं प्रमुख त्यांत । दक्षा मयूरक्षेत्रीं त्वरित । तेथ पाहती आदिशक्तीसी ।।१०।। तिची पूजा करून । ढुंढीस पूजिती एकमन । तदनंतर तप महान । आचरिलें त्यांनी शंभर वर्षें ।।११।। तेव्हा त्यांच्या पुढें प्रकटत । मयूरेश्वर हर्षित । त्यास प्रणाम करून पूजित । नानाविध उपचारांनी ।।१२।। मनोरम सोळा उपचारयुक्त । पूजा करून वंदित । कर जोडून स्तवन करित । महाकाली महालक्ष्मी महासरस्वती ।।१३।। मयूरेशासी विघ्नेशासी । भक्तविघ्नहर्त्यासी । विघ्नदाता तूं अभक्तासी । गणेशा तुला सदा नमन ।।१४।। लंबोदरासी देवासी । मूषकध्वजासी अनाथनाथासी । नाथांच्याही नाथासी । परेशा

तुला नमोनमः ।।१५।। महेशासी सिद्धिदात्यासी । गजाननासी अनंतासी । सदा स्वभक्तां सर्वदासी । ब्रह्मपतीसी तुज नमन ।।१६।। शांतिमयासी महात्म्यासी । शांतीच्या शांतीरूपासी । हेरंबासी कवीसी। कविरूपा तुज नमस्कार ।।१७।। कवीस कविपद दात्यासी । कवीशासी सिद्धिबुद्धिप्रदासी । सिद्धिबुद्धिप्रदात्यासी । सिद्धिबुद्धिचालका तुज नमन ।।१८।। माया मायिक चिन्हांनी । खेळ करिसी प्रतिदिनीं। योगशांतिस्थ भाव ठेवूनी । शांतिप्रद तूं तुज नमन ।।१९।। शक्तीस भानूस विष्णूस । शंकराच्या नाना रूपधरास । नाना खेळ करणाऱ्यास। पुन:पुन: नमन करितसे ।।२०।। वेदादीही जेथ मौन । धरिती तेथ काय करूं स्तवन । शिवादी देवही धरिती मौन । तेथ पाड काय आमुचा ।।२१।। मयूरध्वजा करितों नमन । भक्ति दे तुझी एकमन । सर्वेशा तुझ्या क्षेत्रीं निवास पावन । देई देवा गणाधीशा ।।२२।। गणाधीश ते सर्व वर देती । भक्तितुष्ट त्यांसी म्हणती । जो हें स्तोत्र वाचील जगतीं । अथवा ऐकेल भावयुक्त ।।२३।। तो इहलोकीं भोग भोगून । अन्ती स्वानंद लाभून । ब्रह्मपदाचा लाभ होऊन । धन्यत्व पावेल अक्षय ।।२४।। ऐसें दक्षा महान चरित । कथिलें विकटाचें संक्षेपें तुजप्रत। श्रद्धा ठेवितां सतत । सर्व सिद्धिप्रदायक हें ।।२५।। यासम अन्य कांहीं नसत । कोठेंही कांहीं जगांत । हें साक्षात बह्मपद पूर्ण असत। अधिक काय वर्णावें ।।२६।। हें विकटाचें महिमान । करील पठण अथवा श्रवण। तो नरोत्तम सिद्धि लाभून । धन्य होईल निश्चयें ।।२७।। एक आवर्तन नित्य करील। तो विकटरूप होईल । त्याचें दर्शनही अमल। पावन सर्व जनां होत ।।२८।। जेवढीं अन्य साधने असत । त्यांनीं जेवढे पुण्य लाभत। त्याहून शंभरपट प्राप्त । पुण्य या खंडाच्या श्रवणाने ।।२९।। कांहीं करितां होमहवन । तैसेंची भजनपावन । अथवा तळीं धर्मशाळा बांधून।

सार्वजनिक सेवा करी ।।३०।। तें इष्टपूर्तादिक कर्म । करिता भक्तिपूर्ण मनोरम । त्याहूनही शतगुण पुण्य शोभन । लाभतें खंड हा ऐकता ।।३१।। अन्य पुराणे इतिहासयुक्त । ऐकता पुण्य जें लाभत । त्याहून अधिक पुण्य प्राप्त । ह्या खंडाच्या वाचनानें ।।३२।। काय वर्णावें बहुत जेथ । ब्रह्मपति असे वर्णित । त्या विकटाच्या सम जगांत । अन्य कोण संभवेल ।।३३।। सुत म्हणे शौनकाप्रत । ऐसे सांगून मुद्गल थांबत । महायोग्यास त्या नमित । दक्षप्रजापति हर्षानें ।।३४।। तेव्हां मुद्गल त्यास म्हणत । सांगितलें तुजला विकटचरित । कामासुराचा नाशकर पुनीत। द्विजोत्तमा दक्षा हें पूर्ण ।।३५।। धर्मार्थकाममोक्षदायक । ब्रह्मपर हें पावक । ह्यासम अन्य न सौख्यदायक । आणखी काय ऐकूं इच्छिसी ।।३६।। ऐसें मुद्गलें विचारिलें । तेव्हा दक्षें काय सांगितलें । तें पुढिल खंडी वर्णिलें । सीताराम विनम्र गणेशचरणी ।।३७।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरितसमाप्तिवर्णनं नाम पंचचत्वारिंशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पंचेचाळिसांवा संपूर्ण)

।। ओमिति श्रीमुद्गलपुराणे षष्ठः खंडः समाप्तः ।।

卐